**प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिश्श्याच्या निधी (Other than SC/ST Component) वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०२५/प्र.क्र.६३/गृनिधो-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०२५

**वाचा :-** १. गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, केंद्र शासन यांचे मंजूरी आदेश क्रमांक : N-11012/6/2024-HFA-IV-MoHUA-E-9171348 Dt. 13.03.2025
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दिनांक ०५.१२.२०२३

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या वाचा येथील अ.क्र.१ येथील आदेशान्वये, वित्तीय वर्ष सन २०२४-२५ मध्ये प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत रूपये १९७.४२१५१२० कोटी (अक्षरी रुपये एकशे सत्याण्णव कोटी बेचाळीस लाख पंधरा हजार एकशे वीस फक्त) इतका केंद्र हिश्श्याचा निधी (Other than SC/ST Component) मंजूर करण्यात आला आहे. सदर निधी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास (SNA) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत केंद्र शासनाच्या वाचा अ.क्र.१ येथील आदेशान्वये प्राप्त रूपये १९७.४२१५१२० कोटी इतका केंद्र हिश्श्याचा निधी (Other than SC/ST Component) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्याकरीता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास (SNA) यान्वये वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी कोषागारामार्फत थेट SNA खात्यात जमा होईल, याची म्हाडा प्राधिकरणाने दक्षता घ्यावी

३. सदर निधी संदर्भिय क्रं. १ येथील केंद्र शासनाच्या आदेशात नमूद केलेल्या प्रकल्पांसाठी वितरीत होईल, याची म्हाडा प्राधिकरणाने खातरजमा करावी.

४. सदर निधी मागणी क्र. क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (०८) (०१) सर्वांसाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष २२१६२९९६ अंतर्गत वितरीत करण्यात येत आहे.

५. सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावा.

६. प्रस्तुत प्रकरणी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील.

७. हे आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक २५.०७.२०२४ व वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दिनांक ०५.१२.२०२३ अन्वये तसेच वित्त विभाग अर्थोपाय यांच्या शीट नं.१४८, दिनांक १८.०३.२०२५ अन्वये केंद्र हिश्श्याचा निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे कळविल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१८१८५४१८५८०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA NARAYAN KHETLE

Digitally signed by RAVINDRA NARAYAN KHETLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=188518615e71d343f645c4620bd62f620f5f5af35f72932959997b73ec7e7c41, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69DCF3660DD70A5F443CD1B17131804310A79BF3FE40409DFDA1FAD5E072E484, cn=RAVINDRA NARAYAN KHETLE
Date: 2025.03.18 18:55:24 +05'30'

**( रविंद्र खेतले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण, वांद्रे पूर्व, मुंबई- ५१.
२. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त आणि संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
६. सर्व आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपालिका,
७. सर्व कोषागार अधिकारी.
८. उपसचिव (व्यय-३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्पुटर सेल, नवीन प्रसासन भवन, ५वा मजला, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, अर्थ व लेखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती /गृनियो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२